जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अस्थायी ०२२०/३५/प्र.क्र.२१/कार्यासन ११**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ सप्टेंबर, २०२०.

पहा: १. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१, वित्तीय सुधारणा,दि.१०/९/२००१.
२. शासन निर्णय क्र. अस्थायी ०२२०/३५/प्र.क्र.२१/कार्यासन ११, दि.५/३/२०२०
३. शासन निर्णय वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१/८/२०२०
४.जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे यांचे पत्र क्र.बी-४/Admn/२६८३/२०२०, दि.२२/७/२०२०.

**प्रस्तावना :**

जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे यांच्या आस्थापनेवरील ३१ अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये दि.१/३/२०२० ते ३१/८/२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा व सत्र न्यायालय, धुळे यांनी दि. २२/७/२०२० रोजीच्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार त्यांच्या आस्थापनेवरील पुढील तक्यात नमूद केलेली ३१ अस्थायी पदे दि.१/९/२०२० ते दि.२८/२/२०२१ या कालावधीत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सहायक अधीक्षक | ३ |
| २ | लघुलेखक (नि.श्रे.) | ९ |
| ३ | वरिष्ठ लिपिक | ३ |
| ४ | कनिष्ठ लिपिक | ८ |
| ५ | बेलिफ | २ |
| ६ | वाहनचालक | १ |
| ७ | नाईक | १ |
| ८ | शिपाई | २ |
| ९ | पहारेकरी | १ |
| १० | सफाईगार | १ |
| **एकूण** | | **३१** |

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान, १०५ - दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (२०१४ ०१७२ )(दत्तमत) (अनिवार्य) ०१- वेतन या लेखाशीर्षाखालील सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६ /प्र.क्र.८/१६/ आपुक, दि.३१/८/२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१५१३१८२६८११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Navagire Santosh Sampatti

Digitally signed by Navagire Santosh Sampatti
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ced a096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae 247dd6dd6f47462cd3, cn=Navagire Santosh Sampatti
Date: 2020.09.15 13:20:16 +05'30'

**( सं. सं. नवगिरे )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा न्यायालय, धुळे.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे
६. विधि व न्याय विभाग, कार्या-२०/२३, मंत्रालय, मुंबई,
७. वित्त विभाग, व्यय ५/आ.पु.क.कक्ष/अर्थसंकल्प ११, मंत्रालय, मुंबई,
८. निवडनस्ती (कार्यासन ११).